पुणे विभागातील संरक्षित स्मारकांच्या नियंत्रित क्षेत्रांचे फोटोग्रामेट्रिक आणि लिडार सर्वेक्षण या कामाच्या दुसऱ्या धावत्या देयकास वित्तीय मान्यता देण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन

## पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग

**शासन निर्णय क्रमांक : स्मारक-२०२३/प्र.क्र.३२०/सां.का.३**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १८ फेब्रुवारी, २०२५

**वाचा :-** १) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र. स्मारक-२०२१/प्र.क्र.१९/सां.का.३, दि.२८.०९.२०२१.

२) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र. स्मारके-२०२३/प्र.क्र.३२०/सां.का.३, दि.२८.११.२०२३.

३) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र. स्मारक-२०२३/प्र.क्र.३२०/सां.का.३, दि.३१.०३.२०२४.

४) संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांचे जा.क्र.स्मारके/२०२४/२८८२, दिनांक २७.०९.२०२४ रोजीचे पत्र .

**प्रस्तावना :-**

पुणे विभागातील संरक्षित स्मारकांच्या नियंत्रित क्षेत्रांचे फोटोग्रामेट्रिक आणि लिडार सर्वेक्षण या कामाकरीता रु.३,५६,७५,०००/- इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास उपर्निर्दिष्ट क्र.१ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार या कामाकरीता निविदा प्रक्रिया राबविण्यात आली त्यातील मे.एनरकॉम सोल्युशन प्रा.लि., अहमदाबाद यांच्या न्यूनतम निविदा प्रस्तावास व कमी वाढीच्या निविदेमुळे होणाऱ्या रु.३,३०,६८,६२७/- इतक्या रकमेस सुधारीत प्रशासकीय मान्यता उपर्निर्दिष्ट क्र.२ येथील शासन निर्णयान्वये देण्यात आली आहे. तसेच, उपर्निर्दिष्ट क्र.३ येथील शासन निर्णयान्वये प्रथम धावत्या देयकाच्या रु.६,२६,७८४/- इतक्या रकमेस वित्तीय मान्यता देण्यात आली आहे. आता सदर स्मारकाचे काम प्रगतिपथावर असून या स्मारकाच्या जतन दुरुस्ती कामासाठी कंत्राटदाराचे रु.८५,७५,६५०/- व वास्तुविशारद शुल्क रु.४४,२५०/- अशी एकूण रु.८६,१९,९००/- इतक्या रकमेच्या दुसऱ्या धावत्या देयकास वित्तीय मान्यता देण्याची विनंती संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांनी उपर्निर्दिष्ट क्र.४ येथील पत्रान्वये केली आहे. त्यानुसार या कामाच्या जतन व दुरुस्ती कामास आवश्यक रकमेस वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

पुणे विभागातील संरक्षित स्मारकांच्या नियंत्रित क्षेत्रांचे फोटोग्रामेट्रिक आणि लिडार सर्वेक्षण या कामाकरीता रु.८५,७५,६५०/- व वास्तुविशारद शुल्क रु.४४,२५०/- अशी एकूण रु.८६,१९,९००/- (अक्षरी रुपये शहाऐंशी लक्ष एकोणीस हजार नऊशे मात्र) इतक्या रकमेस या शासन निर्णयान्वये वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

०२. संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, मुंबई यांना यासाठी नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांना अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास या संबंधिच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर काम हे पुरातत्वीय निकषानुसार/मानकानुसार पूर्ण करण्याची जबाबदारी संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, मुंबई व संबंधित संवर्धन वास्तुविशारद यांची असेल.

०३. सदर शासन निर्णय विअप्र-२०१३/प्र.क्र.२०/२०१३/विनिमय, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला उपविभाग तीन मधील अनुक्रमांक ४ मधील परिच्छेद क्र. २७(२) "अ" नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकाराच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

०४. यासाठी होणारा खर्च मागणी क्र. झेडडी-२ पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, २२०५ कला व संस्कृति, (००) (१०३) पुरातत्वशास्त्र, (०१) (०६) राज्यातील ऐतिहासिक व सांस्कृतिकदृष्ट्या महत्वाचे किल्ले व धार्मिक स्थळे यांची जपणूक व संरक्षण (कार्यक्रम) (२२०५ १३०२) २७-लहान बांधकामे या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता उपलब्ध निधीतून भागविण्यात यावा.

०५. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२४/ प्र.क्र.८०/ अर्थ-३, दिनांक २५ जुलै, २०२४ मधील सर्व परिच्छेद व परिशिष्टातील अटींनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, मुंबई यांची राहील.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२५०२१८१८१४११५९२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NANDA
MARUTI RAUT

Digitally signed by NANDA MARUTI RAUT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL DEPARTMENT, 2.5.4.20=281d8ee0076aee3a052a490903f93deadef9f7e2a186620ec03666d244838270, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BAF9D9317025580944685E047B9C52D64C532684054F19E1F02C374B78E1773F, cn=NANDA MARUTI RAUT
Date: 2025.02.18 18:15:09 +05'30'

**( नंदा राऊत )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव (सांस्कृतिक कार्य) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. उपसचिव (सां.का.३), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. सहाय्यक संचालक, पुरातत्व विभाग, पुणे.
६. महालेखापाल -१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. महालेखापाल -२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
८. महालेखापाल -१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९. महालेखापाल -२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१०. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
११. जिल्हा कोषाधिकारी, पुणे.
१२. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. निवड नस्ती, सां.का.३.